**ज्येष्ठ कवी वि. वा. शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांचा दिनांक २७ फेब्रुवारी हा जन्मदिवस "मराठी भाषा गौरव दिन" म्हणून साजरा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक-मभादि-२०१९/(प्र.क्र.१८/१९)/समन्वय,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ फेब्रुवारी, २०१९.

**वाचा**- मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.मभादि-१०१८/प्र.क्र.१६३/भाषा-३, दि. ७ फेब्रुवारी, २०१९.

**परिपत्रक** :

वि.वा शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांनी महाराष्ट्राच्या सांस्कृतिक क्षेत्रामध्ये मोलाचे योगदान दिले असून, मराठी भाषा ही ज्ञानभाषा होण्यासाठी अथक परिश्रम घेतले आहेत. आपल्या मातृभाषेचा गौरव म्हणून ज्येष्ठ कवी वि. वा. शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांचा दिनांक २७ फेब्रुवारी हा जन्मदिन "मराठी भाषा गौरव दिन" म्हणून साजरा करण्याच्या सूचना मराठी भाषा विभागाकडून यापूर्वी दिनांक २१ जानेवारी, २०१३ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत. त्यानुसार या वर्षी देखील मंगळवार दिनांक २७ फेब्रुवारी, २०१९ रोजी राज्यातील उच्च शिक्षण संस्था/ महाविद्यालये/ विद्यापीठे यामध्ये मोठया प्रमाणात व उत्साहात खालीलप्रमाणे विविध उपक्रम आयोजित करुन समारंभपूर्वक मराठी भाषा गौरव दिन सोहळा साजरा करण्याबाबत उपरोक्त "**वाचा**" येथील मराठी भाषा विभागाच्या परिपत्रकान्वये सूचित केले आहे. (प्रत कृपया शासनाच्या संकेतस्थळावर पहावी.)

**२. उपक्रमांची सूची :-**

१) "मराठीतील म्हणींचे जतन व संवर्धन" ही यंदाच्या मराठी भाषा गौरव दिनाची मध्यवर्ती संकल्पना आहे.

चला मराठी म्हण जपू या। मराठीचे धन जपू या !
चला मराठी म्हण जनू या। मराठीचे मन जपू या !

या घोषवाक्यांसह "म्हणी" बाबतच्या विविध स्पर्धा योजणे, भित्तीपत्रकांद्वारे प्रसार माध्यमांवर म्हणींचा प्रसार, म्हणींची पुस्तके व कोश याबाबत चर्चा, परिसंवाद, व्याख्याने इ. उपक्रम योजावेत.

२) सन २०१८-१९ हे वर्ष ज्येष्ठ साहित्यिक, गायक, संगीतकार स्व.पु.ल. देशपांडे व स्व.ग.दि. माडगुळकर यांचे जन्मशताब्दी वर्ष म्हणून साजरे करण्यात येत आहे. या दोन महान व्यक्तींच्या साहित्यावर आधारित कार्यक्रम आयोजित करावेत.

३) भाषा संचालनालयाचे परिभाषा कोश (htts://play.google.com/store/apps/details?id= gov.maharashtra.shabdkoshapp) आणि मराठी विश्वकोश (https://play.google.com/store/apps/details?id=com.bookganga. marathivishwakosh) आता मोबाईल ॲपवर उपलब्ध आहेत. तरी भाषा गौरव दिनाच्या औचित्याने सदर ॲपचा वापर/प्रसार होईल यादृष्टीने महाविद्यालये, विद्यार्थी ,शिक्षक यांनी प्रयत्न करावे.

४) शासनाचे मराठी शब्दकोश/शासनव्यवहार कोश व विविध परिभाषा कोश यांतील माहीती आता एकत्रिपणे https:/shabodakosh.marathi.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. मराठी भाषा गौरव दिनी सदर संकेतस्थळाचे लोकार्पण प्रस्तावित आहे. भाषा गौरव दिनाच्या औचित्याने सदर संकेतस्थळावरील माहिती सर्वांनी जाणून घेण्याकरीता या संकेतस्थळाला भेट द्यावी.

५) मातृभाषेची महती आणि माहीती, तसेच मातृभाषेचे व्यक्तिगत व समाजजीवनातील स्थान आणि मातृभषेचे मानसशास्त्रीय व शिक्षणशास्त्राच्या दृष्टीने महत्व या विषयांवर विचारमंथनात्मक कार्यक्रम आयोजित करावे.

६) सकस साहित्याची, नव्या माहितीची आधुनिक विज्ञान व तंत्रज्ञानाची मराठीतील पुस्तके वाचकांपर्यंत पाहोचविण्याच्या हेतूने राज्यभर ग्रंथप्रदर्शन/ ग्रंथोत्सव/ग्रंथदिंडी आयोजित करणे.

७) शाळा/महाविद्यालये/शासकीय व निमशासकीय कार्यालये/,खाजगी संस्थामध्ये विविध स्तरांवर मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृतीविषयक विविध प्रकारच्या स्पर्धा (निबंध,वकृत्व इ.) आयोजित करणे.

८) न्यायव्यवहार, शासन प्रशासन, प्रसार माध्यमे, केंद्र तथा राज्य शासनाची कार्यालये, इतर अशासकीय कार्यालये इत्यादी ठिकाणी होणारा मराठी भाषेचा वापर याबाबत व्याख्याने, चर्चासत्रे , परिसंवाद, कार्यशाळा, सादरीकरणे यांचे आयोजन मराठी भाषेतून न्यायदान देण्याच्या कामास गती मिळावी यादृष्टीने विधी महाविद्यालयांनी “मराठी अभिमत न्यायालय” (Marathi Moot Court) च्या स्पर्धांचे आयोजन करावे.

९) मराठी भाषा गौरव दिनानिमित्त शासनाच्या विविध भाषा व साहित्यविषयक उपक्रमांना प्रसिध्दी देणे ,

१०) आकाशवाणी व दूरदर्शनवरुन सादर करण्यात येत असलेल्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या प्रायोजित कार्यक्रमामध्ये मराठी भाषाविषयक मान्यवरांच्या मुलाखती, परिसंवाद आयोजित करणे.

११) मराठी भाषा/साहित्य/कोश वाङ्मय या विषयांवर व्याख्याने, चर्चासत्रे, परिसंवाद, कार्यशाळा यांचे आयोजन तसेच तज्ञ, विचारवंत व साहित्यिकांच्या मुलाखतीचे आयोजन करणे,

१२) प्रसारमाध्यमे तसेच प्रशासनात मराठी भाषेचा वापर याबाबत व्याख्याने, चर्चासत्रे, परिसंवाद, कार्यशाळा, सादरीकरणे यांचे आयोजन करणे.

१३) युनिकोडप्रणित मराठी आणि इन्स्क्रिप्ट मराठी कळफलक संबंधित विषयांवरील प्रशिक्षण कार्यशाळांचे आयोजन करणे.

१४) समाजप्रसार माध्यमांतील (सोशल मीडिया) मराठी, माहिती तंत्रज्ञान व मराठी, महाजालावरील (इंटरनेट) मराठी या क्षेत्रातील तज्ञांची व्याख्याने व सादरीकरणे यांचे आयोजन करणे.

१५) मराठी विकीपिडीयावर लेख/माहिती लिहिण्यासाठी शाळा/महाविद्यालये/शासकीय कार्यालये यामध्ये कार्यशाळा भरविणे.

१६) कुसुमाग्रज व इतर सुप्रसिध्द थोर मराठी साहित्यिकांच्या साहित्यावर आधारित कार्यक्रमांचे आयोजन करणे,

१७) दिवंगत साहित्यिकांच्या जन्मगावी/कर्मभूमी येथे स्थानिक शाळांच्या/ग्रंथालयांच्या मदतीने शाळा /ग्रंथालये/वाचनालये येथे स्थानिक शिक्षण संस्था/महाविद्यालये यांचेमार्फत दिवंगत साहित्यिकांचे स्मरण करुन त्यांच्या गौरवार्थ कार्यक्रमाचे आयोजन करणे.

१८) मराठी वर्णमालेबाबत सादरीकरण किंवा व्याख्याने यांचे आयोजन करणे.

१९) बोली भाषांवरील कार्यक्रमांचे आयोजन करणे (व्याख्याने, चर्चासत्रे, सादरीकरणे...इ.),

२०) शब्दभंडार आणि नवीन पर्यायी शब्दनिर्मिती याबाबतच्या स्पर्धांचे आयोजन करणे.

२१) म्हणी, वाक्प्रचार, प्राचीन शब्द यांची व्युत्पत्ती - या विषयांवर रंजक व्याख्याने/सादरीकरणे,

२२) मराठी सुलेखन, सुंदर मराठी हस्ताक्षर स्पर्धा व संबंधित कार्यशाळांचे आयोजन करणे.

२३) मराठी कविता, प्रसिध्द उतारे, मराठी भाषा विषयक घोषवाक्ये यांचे भित्तीचित्र प्रदर्शन किंवा स्पर्धेचे आयोजन करणे.

२४) मोडी लिपी चे प्रशिक्षण, व्याख्यान किंवा परिसंवादाचे आयोजन करणे,

२५) मराठी भाषेच्या सर्वांगीण विकासासाठी कार्य करणाऱ्या नि:स्पृह व्यक्तींना आणि त्यांनी निर्माण केलेल्या संस्थाना किंवा प्रकल्पांना भेट देणे.

३. वरील उपक्रम करण्यासाठी भाडे इत्यादिसाठी येणारा खर्च विद्यापीठांनी त्यांच्या निधीमधून करावा.

४. सदर कार्यक्रम अकृषी विद्यापीठे/महाविद्यालयांच्या कॅम्पसबाहेर होणार असल्याने, शहरातील सांस्कृतिक सभागृहे/प्रांगण/ऐतिहासिक ठिकाणे/चौक इत्यादि ठिकाणांचे/जागांचे कार्यक्रमासाठीचे आरक्षण विहित कालावधीपूर्वी करण्यात यावे. सह संचालक, उच्च व तंत्र शिक्षण यांनी अकृषी विद्यापीठे यांचेशी संपर्क करुन, सदरहू कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी प्रयत्न करावा.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेताक २०१९०२१८१२१४५६७७०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatraya Rambhau Kahar

Digitally signed by Dattatraya Rambhau Kahar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc29789a0057acb8ed170e1748553c17db300239c347be5264afbff5eb51fcac, cn=Dattatraya Rambhau Kahar
Date: 2019.02.18 12:18:30 +05'30'

**( द.रा. कहार )**
उप सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
२.मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३.मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४.मा.विरोधी पक्ष नेता(विधानसभा/विधापरिषद), विधान भवन, मुंबई.
५.सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, मराठी भाषा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.

७. सर्व सह/उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८..महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व कुलगुरु, सर्व अकृषि विद्यापीठे/अभिमत विद्यापीठे/स्वयं-अर्थसहाय्यीत विद्यापीठे.
१०. सर्व कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे/अभिमत विद्यापीठे/स्वयं-अर्थसहाय्यीत विद्यापीठे
११. संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य , मुंबई.
१४. संचालक, ग्रथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५. सर्व मंत्रालय विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. संग्रहार्थ (समन्वय).